सांकेतांक क्र. २०१४१२२०१५१६०९२८२२

महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्यादित) या महामंडळावरील श्री.संजय सावंत,व्यवस्थापकीय संचालक यांच्या दि.०१/१२/२०१४ ते दि.३१/१२/२०१४ या वैद्यकीय रजेच्या कालावधीचा अतिरिक्त कार्यभार श्री.राकेश बेद, महाव्यवस्थापक यांना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक –शिकाना-२०१४/प्र.क्र.५६/महामंडळे**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई – ४०००३२.**
**दिनांक : १२ डिसेंबर २०१४**

**प्रस्तावना :-** श्री.संजय सावंत ,व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्यादित) हे मधुमेह,रक्तउच्चदाब व पॅक्रियाआयटीस विकारामुळे आजारी असल्याने त्यांना सेंट जॉर्ज हॉस्पीटल,मुंबई येथे दि.०१/१२/२०१४ रोजी दाखल करुन घेण्यात आले होते. त्यानंतर त्यांना दवाखान्यातुन डिस्चार्ज देण्यात आला. तथापी, त्यांना उपचार जारी ठेवण्याकरिता व विश्रांतीकरिता त्यांना डॉक्टरांनी ३ आठवडे विश्रांती घेण्याचा सल्ला दिला आहे. यास्तव या महामंडळाचा त्यांचा व्यवस्थापकीय संचालक पदाचा त्यांच्या वैद्यकीय रजेच्या कालावधीतील अतिरिक्त कार्यभार श्री.राकेश बेद, महाव्यवस्थापक यांना देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** श्री.संजय सावंत ,व्यवस्थापकीय संचालक,महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ(मर्यादित) यांच्या वैद्यकीय रजेच्या कालावधीतील (दि.०१/१२/२०१४ ते दि.३१/१२/२०१४) अतिरिक्त कार्यभार श्री.राकेश बेद,महाव्यवस्थापक यांना या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(आर.डी.शिंदे)
संचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति:-

१) श्री.संजय सावंत ,
व्यवस्थापकीय संचालक,
महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्यादित)

२) श्री.राकेश बेद,महाव्यवस्थापक
महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्यादित)

**प्रत :- माहितीसाठी सादर -**
मा.राज्यपालांचे खाजगी सचिव,

मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, १, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
आयुक्त, समाजकल्याण, संचालनालय, पूणे
सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग
सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
निवडनस्ती, का-महामंडळे